**यवतमाळ नगरपरिषद हद्दीतील सा. बां. विभागाच्या अखत्यारीतील रस्त्यांचे हस्तांतरण यवतमाळ नगरपरिषदेकडे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- टीआरएस २०१७/प्र.क्र.१३६/रस्ते-१.**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११/०४/२०१७.

संदर्भ - १. मुख्य अभियंता सा. बां. प्रादेशिक विभाग अमरावती याचे पत्र क्र. का -२ (२)/रस्ते अवर्गीकृत /७१८, दि. १७/२/२०१७.
२.सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र. रवियो-२०१७/प्र.क्र.३/नियोजन-२ दि. १८/३/२०१७.

**प्रस्तावना :-**

यवतमाळ नगरपरिषदेच्या हद्दीतील सा. बां. विभागाच्या अखत्यारीतील काही रस्ते नगर परिषदेच्या नगर परिषदेकडे वर्ग करण्याची मागणी नगर परिषद यवतमाळ यानी केली आहे. या हस्तांतरणामुळे शहराच्या हद्दीतील रस्त्यांची दुरूस्ती व देखभाल तसेच रस्त्यांची सुधारणा नगर परिषदेच्या विकास आराखडयानुसार करणे शक्य होईल. यामुळे शहरातील ग्रामस्थांना सोयीचे होईल. याबाबीचा विचार करुन सदर रस्ते अवर्गीकृत करण्याचा निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाने दि. १८/३/२०१७ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे घेतला आहे. आता सदर रस्ते यवतमाळ नगरपरिषदेकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात सविस्तर अभ्यास करुन शासन आता रस्ते हस्तांतरण संदर्भात पुढील प्रमाणे निर्णय निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाकडे देखभाल दुरुस्तीसाठी असलेल्या खालील नमूद केलेल्या रस्त्यांची लांबी यवतमाळ नगरपरिषदेकडे हस्तांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | रस्त्याचे नांव व दर्जा | हस्तांतरीत करावयाच्या रस्त्याची लांबी साखळी क्रमांकासह | एकूण लांबी |
|---|---|---|---|
| १. | बडनेरा यवतमाळ वणी घुग्गुस प्रमुख राज्यमार्ग- १४ | २१५/८०० ते २१७/८०० (बसस्थानक चौक ते पांढरकवडा रोड यवतमाळ वळण रस्त्यापर्यंत) लांबी | २.०० कि.मी. |
| २. | नागपूर बोरी तुळजापुर प्ररामा-६ | यवतमाळ बसस्थानक ते आर्णी रोड वनवासी मारोती कि.मी. १४६/०० ते १५०/०० | ४.०० किमी |
| ३. | अंजनगांव मुर्तीजापूर दारव्हा यवतमाळ राज्यमार्ग क्र २८२ | दारव्हा रोड लोहारा ते बसस्थानक चौक यवतमाळ कि.मी. १६१/५०० ते १६५/४०० | ३.९० किमी |
| ४ | चांदुर बाजार तिवसा धामणगांव यवतमाळ राज्यमार्ग क्र ३०० | धामणगाव नाका ते यवतमाळ पोस्ट ऑफीस कि.मी. १२४/२०० ते १२८/७५० | ४.५५० किमी |
| | | एकुण | १४.४५ कि.मी. |

२. सार्वजनिक बांधकाम मंडळ यवतमाळ यांनी नगर परिषद, यवतमाळ यांच्या ताब्यात द्यावयाची लांबी खालील अटीं व शर्तीच्या पुर्ततेच्या अधीन राहुन वर्ग करण्यात यावी :-

१) सदर रस्ते जमिनीच्या मालकीसह कायमस्वरुपी देखभाल व दुरुस्तीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून यवतमाळ नगर परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात यावेत.

२) सदर रस्ते यवतमाळ नगर परिषदेकडे वर्ग करण्यात आल्यानंतर रस्त्याच्या लांबीच्या वार्षिक विवरणपत्रात योग्य ते बदल करण्यात यावेत.

३) हस्तांतरित करण्यात येत असलेले रस्ते यवतमाळ नगरपरिषद, यवतमाळ यांचे ताब्यात दिल्याचा दिनांक शासनास योग्य वेळी कळविण्यांत यावा.

४) रस्ते हस्तांतरित केल्यानंतर त्यावरील अतिक्रमणे/लीज बांधकाम, कंत्राट अथवा इतर संलग्न विषयाची हाताळण्याची करण्याची जबाबदारी यवतमाळ नगरपरिषद यांची राहील.

५) यवतमाळ नगरपरिषद यांनी वरील विषयाबाबत कांही न्यायालयीन आदेश असल्यास त्याचा अवमान होणार नाही ह्याची दक्षता घ्यावी. संबंधित न्यायालयीन प्रकरणाची कागदपत्रे प्राप्त करून योग्य ती कार्यवाही करण्याची जबाबदारी यवतमाळ नगर परिषद यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१११६२४५०५३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

C V Bhatkhande

Digitally signed by C V Bhatkhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0b1e69c845ea0d8097d6c6057154f411ad937502168fce2f0ac043de142e0826, cn=C V Bhatkhande
Date: 2017.04.11 16:26:57 +05'30'

**( चं.वि.भातखंडे )**
**अवर सचिव तथा कार्यकारी अभियंता (रस्ते)**

**प्रत,**

१. मुख्याधिकारी यवतमाळ नगरपरिषद, यवतमाळ.
२. वित्त विभाग (व्यय ६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. महालेखापाल २, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. मुख्य अभियंता, सा. बां.प्रादेशिक विभाग,अमरावती.
८. अधिक्षक अभियंता, सा. बां. मंडळ,यवतमाळ
९. विभागीय आयुक्त,अमरावती.
१०. जिल्ह्याधिकारी,यवतमाळ.
११. जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य,अमरावती.
१२. जिल्हा निरीक्षक, भूमी अभिलेख, यवतमाळ.
१३. कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग,यवतमाळ.

१४. कार्यासन अधिकारी, कार्यासन सेवा ५/अर्थ १/नियोजन-१/प्रशासन १/रस्ते ४/रस्ते ७/मिव्य २ सा.बां.विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

१५. कार्यासन अधिकारी रस्ते-१ (निवड नस्ती) सा.बां.विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

१६. कार्यासन अधिकारी,लेखापरिक्षा,सारसंग्रहासाठी,सा.बां.विभाग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.